**केंद्र पुरस्कृत सिल्क समग्र (ISDSI) योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांकरिता भारतीय बनावटीची स्वयंचलीत रिलींग मशिनरी ४०० एन्डस उभारणीकरिता फरकाच्या रक्कमेचा निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : केंपुयो-१०२०/प्र.क्र.४१/रेशीम कक्ष**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक : ३१ मार्च, २०२३.

<u>वाचा</u> :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. प्रावियो-१०१८/प्र.क्र.९०/रेशीम कक्ष, दिनांक २४ मे, २०१९.

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. प्राविंयो-१०१८/प्र.क्र. ९०/रेशीम कक्ष, दिनांक १४ जानेवारी, २०२१.

३) केंद्रीय रेशीम मंडळाचे पत्र क्र. CSB/CSTRI/SILKSAMAGRA-ISDSI/ARM/192C/2017-20/PMC-VOl-III/ 104, दिनांक ०५ एप्रिल, २०२१.

४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. केपूयो-१०२०/प्र.क्र. ४१/रेशीम कक्ष, दिनांक ३० मार्च, २०२२.

५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२.

६) केंद्रीय रेशीम मंडळाचे पत्र क्र. CSB-37/1/CSS(Silk Samagra) Maharashtra/2018-19/Vol-l, दिनांक ०६ जुलै, २२.

७) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र. रेशीम/कार्या-९/सि समग्र/अेआरएम/ फरकांचा निधी/ केंव राहि/ BDS/ १५८४, दिनांक १६.११.२०२२ व दि.२६.१२.२०२२

८) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२३.

९) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. पुन्र्वी-२३२३/प्र.क्र.२६/२०२३/१७ स, दिनांक ३१ मार्च, २०२२.

**<u>प्रस्तावना</u> : -**

केंद्र पुरस्कृत “सिल्क समग्र” योजनेंतर्गत सन २०१९-२० मधील सर्वसाधारण प्रवर्गातील ०२ लाभार्थ्यांसाठी स्वंयचलित ॲटोमॅटीक रिलींग युनीट उभारणीसाठी मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार केंद्रीय रेशीम मंडळ, बंगळूरु यांनी राज्याकडे अखर्चित राहीलेला केंद्र हिस्सा सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात वापरण्यास त्यांचे संदर्भाधीन दि.१४.०७.२०२१ रोजीच्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. त्याअनुषंगाने संचालक (रेशीम) यांनी केलेल्या विनंतीनुसार केंद्र पुरस्कृत सिल्क समग्र योजनेंतर्गत सन २०१९-२० मधील सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठी अखर्चित राहीलेला केंद्र हिस्सा ₹१६९.७९४ व त्यास पूरक राज्य हिस्सा ₹८४.९०१ लक्ष असा एकूण ₹२५४.६९५ लक्ष इतका निधी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून वितरीत करण्यात आला होता. त्यामध्ये स्वंयचलित ॲटोमॅटीक रिलींग युनीट उभारणीची युनीट कॉस्ट ₹१२२.०२ लक्ष प्रमाणे ०२ पात्र लाभार्थ्यांना केंद्र हिस्सा ₹१२२.०२ लक्ष व त्यास पुरक राज्य हिस्सा

₹६१.०४ लक्ष इतका निधी दि.३०.०३.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये संचालक (रेशीम) यांना खर्च व वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली होती. त्याप्रमाणे संचालक (रेशीम) यांनी सदर अनुदानाची रक्कम योजनेच्या मार्गदर्शक प्रणालीनुसार संबंधित लाभार्थ्यांच्या ESCROW ACCOUNT मध्ये जमा केली आहे.

केंद्रीय रेशीम मंडळाच्या दि.०५.०४.२०२१ रोजीच्या पत्रान्वये आत्मनिर्भर भारत व व्होकल फॉर लोकल अभियान अंतर्गत भारतीय बनावटीची स्वंयचलित ॲटोमॅटीक रिलींग युनीट ४०० एन्डच्या युनीट कॉस्टमध्ये ₹१४१.०२ लक्ष इतकी सुधारणा केली आहे. त्याप्रमाणे केंद्रीय रेशीम मंडळाने दि.०६.०७.२०२२ रोजीच्या पत्रान्वये सुधारीत युनीट कॉस्टप्रमाणे फरकाची रक्कम ₹१८.९४७७२ लक्ष इतकी रक्कम रेशीम संचालनालयाच्या आहरण व सवितरण अधिकाऱ्याच्या बँक खात्यात जमा केली आहे.

केंद्र पुरस्कृत सिल्क समग्र योजनेंतर्गत सन २०२२-२३ या वित्तीय वर्षाकरिता केंद्र हिस्सा ₹२५०.०० लक्ष व त्यास पुरक राज्य हिस्सा ₹१२५.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. सन २०२३ च्या पहील्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात सुधारीत अंदाजानुसार केंद्र हिस्सा ₹२५०.०० लक्ष व त्यास पुरक राज्य हिस्सा ₹५९.५४ लक्ष इतकी तरतूद मंजूर केली आहे. त्या अनुषंगाने संचालक (रेशीम) यांनी सदर योजनेसाठी केंद्र हिस्साकरिता ₹१८.९४७ लक्ष व त्यास पुरक राज्य हिस्सा ₹९.४७४ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची विनंती केली आहे. तथापि, राज्य योजनेंतर्गत सुधारीत अंदाजानुसार खर्च वजा जाता ₹८.८८४ लक्ष ( ₹५९.५४-₹४१.६९०-₹८.९६६) इतका निधी शिल्लक राहत असून याकरिता ₹०.५९ लक्ष कमी पडत आहे. त्यामुळे सदर रक्कम रेशीम योजनेंतर्गत पायाभूत सुविधा निर्मिती व अस्तिवातील सुविधांचे बळकटीकरण (२८५१ ६५८३) ३३ अर्थसहाय्य यामधील बचतीतून राज्य हिस्सा (२८५११२०४) ३१ सहायक अनुदान याअंतर्गत पुर्नविनियोजनाद्वारे मान्यता देण्याची विनंती वित्त विभागास करण्यात आली आहे. त्यानुसार वित्त विभागाने सदर रक्कम पुर्नविनियोजनाद्वारे वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने वाचा क्र. ९ येथील शासन निर्णयान्वये विभागाच्या अर्थसंकल्पीय शाखेने पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन दिलेली आहे. त्यामुळे संचालक (रेशीम) यांच्या मागणीनूसार भारतीय बनावटीची स्वंयचलित ॲटोमॅटीक रिलींग युनीट ४०० एन्ड (IARM) उभारणीसाठी फरकाची रक्कमेचा केंद्र हिस्सा व त्यास पुरक राज्य हिस्सा वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्रीय रेशीम मंडळाने मान्यता दिलेल्या केंद्र पुरस्कृत "सिल्क समग्र" योजनेंतर्गत सन २०१९-२० मधील सर्वसाधारण प्रवर्गातील ०२ लाभार्थ्यांसाठी भारतीय बनावटीची स्वंयचलित ॲटोमॅटीक रिलींग युनीट ४०० एन्ड (IARM) उभारणीसाठीच्या सुधारीत किमंतीनुसार फरकाची रक्कम केंद्र हिस्सा ₹१८.९४८ लक्ष व त्यास पुरक राज्य हिस्सा ₹ ९.४७४ लक्ष इतका निधी वितरीत व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. केंद्रीय रेशीम मंडळाच्या मार्गदर्शक सुचनाप्रमाणे तसेच, वित्त विभागाच्या प्रचलित नियमानुसार व वेळोवेळी दिलेल्या सुचनांप्रमाणे सदर निधी खर्च करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

३. सदर निधी ISDSI योजनेच्या सुधारीत मानकांना दिलेल्या प्रशासकीय मंजूरीनुसार व त्या संदर्भातील मार्गदर्शक सुचनांनुसार संचालक (रेशीम) यांनी खर्च करावा. तसेच, ज्या योजनांसाठी व

बाबींसाठी केंद्र शासनाने निधी उपलब्ध केला आहे, त्याच बाबींवर सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या निधीतून झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्रीय रेशीम मंडळ व शासनास विहीत मुदतीत सादर करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

४. सदर योजनेंतर्गत अनुदान देताना नानाजी देशमुख कृषि संजिवनी योजना प्रकल्प व इतर शासकीय योजनेंतर्गत लाभ दिला नसल्याची खात्री करुनच पात्र लाभार्थ्यांना अनुदान अदा करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

५. सदर योजनेखाली केंद्र हिश्श्यासाठी ₹१८.९४८ लक्ष (अक्षरी रुपये अठरा लक्ष चौऱ्याण्णव हजार आठशे फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यात येत असून उक्त खर्च हा "मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०२)(४९) रेशीम उद्योगाचा विकास (केंद्र पुरस्कृत) (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२८५११२६९), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" अंतर्गत सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

तसेच, राज्य हिश्श्यासाठी ₹९.४७४ लक्ष (अक्षरी रुपये नऊ लक्ष सत्तेचाळीस हजार चारशे फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यात येत असून उक्त खर्च हा "मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०२)(४५) रेशीम उत्पादक, खादी ग्रामोद्योग व ग्रामोद्योग विकास (कार्यक्रम) (२८५११२०४), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" अंतर्गत सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी सुधारीत अंदाज व पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. उक्त निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्यासाठी संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांना नियंत्रण अधिकारी (V003) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उक्त निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांचे अधिनस्थ सुपूर्द करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.३२४/व्यय-२, दि.३१.०३.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२३०३३१२१२८५५४३०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ALKA V JAGTAP

Digitally signed by ALKA V JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=448f510bcadc7abd929408343ee74834ba4d3c8add456b66852582b6097ed093, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=32CC1545A1B50545BD5194D8C8A8B31532D9A97E1216092600CDFE0B5E29CEA1, cn=ALKA V JAGTAP
Date: 2023.03.31 22:11:13 +05'30'

**(अलका वि जगताप)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) अ.मु.स (नियोजन) नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई

३) अ.मु.स (वित्त) , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) सचिव (वस्त्रोद्योग), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
८) संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर.
९) सदस्य-सचिव, केंद्रीय रेशीम मंडळ, बंगळूरु.
१०) कोषागार अधिकारी, नागपूर.
११) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१२) नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई.
१३) वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१३/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१४) सर्व प्रादेशिक रेशीम कार्यालये.
१५) सर्व जिल्हा रेशीम कार्यालये.
१६) अवर सचिव (का-१७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवड नस्ती (रेशीम कक्ष).